सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा या योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांना सहायक अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सअप-२०१४/प्र.क्र.७९/का-९**
**मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.**
तारीख: **२७ मार्च, २०१५.**

वाचा :-

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अंदाज-२०१२/प्र.क्र.६४/२०१२/अर्थसंकल्प-३, दिनांक ४ मे, २०१२.
२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि. १ जुलै, २०१४.
३. परिविक्षा अधिक्षक, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र. मबाविआ/अपअ /१४-१५/अनौ.सं./का-७/५३७०, दि. ३०.८.२००४.
४. शासन निर्णय समक्रमांक दिनांक १/११/२०१४
५. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि. ९/२/२०१५.

**शासन निर्णय :-**

सन २०१४-१५ साठी सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजना या योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांना मागणी क्र. एक्स-१ (२२३५-०११-३) सहायक अनुदान (योजनेत्तर योजना) या लेखाशिर्षाखाली रु. २,००,०००/- (अक्षरी रुपये दोन लाख फक्त ) इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. सदर निधीपैकी ६०% निधी म्हणजे रु. १,२०,०००/- (अक्षरी रुपये एक लाख वीस हजार) इतकी तरतूद वित्त विभागाच्या मान्यतेने खर्च करण्यास वाचा क्र.४ येथील शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली आहे.

वाचा क्र.५ येथील शासन परिपत्रकानुसार सदर लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतुदीपैकी २५ % निधी म्हणजे रु. ५०,०००/- (अक्षरी रुपये पन्नास हजार फक्त) इतकी तरतुद वित्त विभागाच्या मान्यतेने खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

वाचा क्र. १ येथील दिनांक ४ मे, २०१२ च्या शासन परिपत्रकातील परिच्छेद ९ नुसार सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजना या योजनेत्तर योजनेस सहायक अनुदान या बाबींसाठी पूर्वी दिलेल्या अनुदानाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय अनुदान वितरीत करु नये, अशी प्रमुख अट

आहे. त्यामुळे आयुक्त, महिला व बाल विकास,पुणे यांनी अनुदान वितरीत करतांना उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर रक्कम मागणी क्र. एक्स-१, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२, समाजकल्याण १०६ सुधार सेवा (०१) (०१) सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजना ( २२३५-०११-३) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या योजनेत्तर योजना या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ मध्ये वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या मान्यतेने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. २५९/१५ व्यय-६, दिनांक २५/३/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२०१५२९४१३६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DALVI VINOD VASANT

Digitally signed by DALVI VINOD VASANT
DN: CN = DALVI VINOD VASANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 917996
Reason: I am the author of this document
Date: 2015.04.23 15:04:53 +05'30'

**वि.वा. दळवी**
**कक्ष अधिकारी**

प्रत,

आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर.
वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे (आयुक्तालयामार्फत)
परिविक्षा अधिक्षक, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
वित्त विभाग (व्यय-६), (अर्थसंकल्प-७), मादाम कामा रोड,मंत्रालय,मुंबई
अवर सचिव (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
कक्ष अधिकारी, कार्या-०४, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती (कार्या-९) महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई